पोर्ले तर्फ ठाणे (ता. पन्हाळा, जि. कोल्हापूर) येथील या नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः क्र. पापुयो - २४१२/प्र.क्र. १७४/पापु १७**
**मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**
**मुंबई-४०० ०३२**
**तारीख: ७ मार्च, २०१७**

**वाचा -**

१) शासन निर्णय क्र.ववेका (किणका)-१०९७/सीआर-४०००/(ड)/पापु-१० दि. २० डिसेंबर,१९९७.
२) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, सांगली यांचे पत्र क्र. जा.क्र.तांशा-२/पोर्ले तर्फ ठाणे नपापु/२६०/२०१७ दिनांक ३१ जानेवारी, २०१७.
३) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, सांगली यांचे पत्र क्र.तांशा-२/२६८/२०१७ दिनांक ३१/०१/२०१७.

**प्रस्तावना**

**पोर्ले तर्फ ठाणे, (ता. पन्हाळा, जि. कोल्हापूर)** नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.१,६०,१०,०००/- (ढोबळ) किमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भीय क्र.**१** येथील शासन निर्णयान्वये मुळ प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापी सदर योजनेचे मूळ काम वन विभागाने थांबविल्याने नव्याने निविदा काढण्यात आल्या. त्यामुळे दरसूचीत झालेल्या बदलामुळे योजनेच्या निव्वळ किंमतीत वाढ झाली. अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, सांगली याचे संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये प्रस्तुत योजनेच्या **रु.** १,७०,७६,०००/-(ढोबळ) किंमतीच्या अंदाजपत्रकास सुधारीत तांत्रिक मान्यता दिल्याचे कळविले आहे. परिणामी, अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, सांगली यांनी प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भाधिन पत्र क्र.३ अन्वये शासनास सादर केला होता. तद्‌नुषंगाने प्रस्तुत योजनेच्या अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

**पोर्ले तर्फ ठाणे, (ता. पन्हाळा, जि. कोल्हापूर)** या नळ पाणी पुरवठा योजनेच्या **योजनेच्या रु. १,७०,२९,९००/- (ढोबळ) (अक्षरी रुपये एक कोटी सत्तर लक्ष एकोणतीस**

**हजार नऊशे फक्त)** एवढ्या सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी**

१. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.
२. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.
३. सदर योजना पुर्ण होऊन संबंधीत ग्रामपंचायतीस हस्तांतरीत झालेली असल्याने, सदर योजनेचे लेखे १ महिन्यात बंद करण्यात यावेत.
४. सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखाभाल दुरुस्ती अभावी, वीज देयक न भरल्यामुळे ( Poor maintenance/nonpayment of electricity of bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. तरी सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वेळोवेळी वाढ करण्याची जबाबदारी संबधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद यांची राहील.
५. हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.
६. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

२. या योजनेच्या सुधारित किंमतीतील वाढीव खर्च **रु.१०,१९,९००/- (अक्षरी रुपये दहा लक्ष एकोणीस हजार नऊशे फक्त)** हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमा खालील राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून /किमान गरजा कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

३. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या दि. १७/०४/२०१५ च्या क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२ या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र. २७ (अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201703071658153328 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dnyaneshwar M Jawale

Digitally signed by Dnyaneshwar M Jawale
DN: CN = Dnyaneshwar M Jawale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2017.03.07 17:25:56 +05'30'

**( ज्ञा. म्हा. जावळे)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
२) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता.
३) मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)
४) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, सांगली
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर.
६) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
७) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
८) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
९) वरिष्ट भुवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, कोल्हापूर.
१०) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, कोल्हापूर
११) अतिरिक्त मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१२) प्रधान सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१३) कार्यासने (पापु-०४, पापु-१० व पापु-२०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय,मुंबई-३२.
१४) निवडनस्ती कार्यासन पापु-१७.